**"अधिकारी व कर्मचारी प्रशिक्षण शैक्षणिक साहीत्याची निर्मिती व गुणवत्ता वाढ कार्यक्रम" राज्यस्तरीय सर्वसाधारण योजनेस प्रशासकीय मान्यता देणे..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी -२०१०/प्र.क्र.३०१/व्यशि-४,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक: १२ ऑगस्ट, २०११

**संदर्भ :-** प्र.संचालक, (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक

१) ६/नियोजन/रा.यो./कर्म.प्रशिक्षण/प्र.मं/१५६, दिनांक २९ ऑक्टोंबर, २०१०
२) ६/नियोजन/रा.यो./कर्म.प्रशिक्षण/प्र.मं/०९, दिनांक १४ जानेवारी, २०११
३) ६/नियोजन/रा.यो./कर्म.प्रशिक्षण/प्र.मं/१९/११३, दिनांक २१ जून, २०११

**प्रस्तावना :-** विकासक्षेत्र सामाजिक सेवा, उप विकास क्षेत्र व्यवसाय शिक्षण अंतर्गत व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातर्गत मुख्य कार्यालय, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ, ०६ प्रादेशिक कार्यालये, ३१ जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये, १६९ शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, १२७८ अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालये, १९६७ अशासकीय विना अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालये कार्यरत आहेत.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील संस्थांमध्ये **अ)** माध्यमिक शालांत परिक्षा पूर्व तांत्रिक/व्यवसायिक शिक्षणाचा विकास करणे, **ब)** +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रम, **क)** +२ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम, **ड)** महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळाचे प्रमाणपत्र अभ्यासक्रम या ४ योजना राबविण्यात येतात. तसेच Modular Employable Skill ही केंद्र शासन पुरस्कृत योजनाही राबविण्यांत येते.

सध्या व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातर्गत शासकीय संस्थेमध्ये २७५ अधिकारी, ११७८ शिक्षकीय कर्मचारी, ८७९ शिक्षकेत्तर कर्मचारी असा एकूण २३३२ अधिकारी व कर्मचारीवृंद कार्यरत आहे. तसेच अशासकीय अनुदानित संस्थांमध्ये ६७०४ शिक्षकीय व ९९० शिक्षकेत्तर कर्मचारी असा एकूण ७६९४ कर्मचारीवृंद कार्यरत आहे. सबब संचालनालयांतर्गत एकूण १०,०२६ अधिकारी व कर्मचारीवृंद कार्यरत आहे. एवढया मोठया प्रमाणावर मनुष्यबळ उपलब्ध असूनही त्यांना प्रशिक्षण देण्याची पुरेशी व्यवस्था नाही. ही बाब लक्षात घेऊन उपलब्ध मन्युष्यबळाची कार्यक्षमता व उत्पादकता पर्यायाने प्रशिक्षणाची गुणवत्ता वाढविण्यासाठी अधिकारी व कर्मचारी वर्गास प्रशिक्षण देण्याचा कार्यक्रम हाती घेणे आवश्यक आहे.

सबब "अधिकारी व कर्मचारी प्रशिक्षण, शैक्षणिक साहित्याची निर्मिती व गुणवत्ता वाढ कार्यक्रम" या राज्यस्तरीय सर्वसाधारण योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- उपरोक्त विवेचन विचारात घेता, "अधिकारी व कर्मचारी प्रशिक्षण, शैक्षणिक साहित्याची निर्मिती व गुणवत्ता वाढ कार्यक्रम" या राज्यस्तरीय सर्वसाधारण योजनेस पुढील अटींचे व शर्तीचे अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

१. व्यवसाय शिक्षणाशी संबंधित व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थांमधील अधिकारी, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यांत यावा. शिक्षकीय कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षणास प्रथम प्राधान्य देण्यांत यावे.

२. प्रशिक्षण कार्यक्रम जिल्हा, विभाग किंवा प्रशिक्षणाच्या सर्व सोयी उपलब्ध असलेल्या ठिकाणी गरजेनुसार व सोईनुसार आयोजित करण्यांत यावेत.

३. प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये संबंधित विषयाचे अद्यावत ज्ञान देणे, आधुनिक दृक्श्राव्य साधनांचा उपयोग करून शिकविणे. Learning/Instructional Material तयार करणे. शिकविण्याच्या पध्दती / तंत्रज्ञान, विद्यार्थी विकास व विद्यार्थी हाताळण्याच्या पध्दती, मन्युष्यबळ विषयक विविध कार्यक्रम रोजगार व स्वयंरोजगाराशी निगडीत कार्यक्रम इत्यादींचा अंतर्भाव असावा.

४. अधिकाऱ्यांना देण्यात येणा-या प्रशिक्षणामध्ये नेतृत्व विकास, संप्रेशन, प्रशासकीय व आर्थिक बाबीं, Good Goverance, विद्यार्थी हित, व्यवस्थापकीय कौशल्य इत्यादीं बाबींचा अंतर्भाव असावा.

५. शिक्षकेत्तर कर्मचारी प्रशिक्षणामध्ये प्रशिक्षण, वित्तीय, भाडांर व्यवस्थापन, आस्थापना विषयक प्रशासकीय बार्बी हाताळणे, शासनाने विहित केलेले नियम व त्यामध्ये वेळोवेळी करण्यांत आलेली दुरूस्ती, संगणक साक्षरता, आधुनिक तंत्रज्ञानाची ओळख इत्यांदीं बाबींचा अंतर्भाव असावा.

६. सदर प्रशिक्षण कार्यक्रमाचा कालावधी गरजेनुसार निश्चित करण्यांत यावा. प्रशिक्षणामध्ये Industrial Training आणि In Sercvice Training यांचा अंतर्भाव करण्यांत यावा.

७. प्रशिक्षण शक्यतो विभागाबाहेरील तज्ञ व्यक्तिंमार्फत देण्यांत यावे.

८. पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रमांसाठी पुस्तके व इतर , Learning / Instructional Material, मॉडेल, Documentary इत्यादीं तयार करण्यांत यावे.

९. प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्याची जाबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण) यांची राहील. संचालक (व्यवसाय शिक्षण) यांनी प्रशिक्षणाचे वार्षिक वेळापत्रक तयार करावे. त्यानुसार नियमितपणे प्रशिक्षण देऊन, त्रैमासिक अहवाल शासनास सादर करावा.

१०. या योजनेसाठी नियतव्ययाची मागणी करणे, निधी अर्थसंकल्पीत करणे व खर्च करणे यांची जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण) यांची राहील.

ब) " अधिकारी व कर्मचारी प्रशिक्षण, शैक्षणिक साहित्य निर्मिती व गुणवत्ता वाढ कार्यक्रम" या योजनेसाठी उपलब्ध निधी खालील बाबींवर खर्च करण्यांत यावा.

१. प्रशिक्षण देणाऱ्या तज्ञ व्यक्तींचे मानधन, त्यांचा प्रवास भत्ता व रहाण्याचा खर्च,
२. अधिकारी व कर्मचारी यांचा प्रवास खर्च व दैनंदीन भत्ता.
३. प्रशिक्षण कार्यक्रमांमध्ये प्रशिक्षणार्थ्यांना देण्यात येणाऱ्या Learning/Instruction Material तयार करण्यासाठी होणारा सर्व खर्च (उदा. छपाई, स्टेशनरी खर्च)
४. प्रशिक्षणाबाबत देण्यांत येणाऱ्या आस्थापना भेटीं व इतर खर्च.
५. Workshop व Conference चे अनुषांगिक खर्च. (उदा.जागेचे भाडे व इतर सुविधांवरील खर्च)
६. पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रमांची पुस्तक छपाई व इतर Learning/Instructional Material, तज्ञांचे मानधन, प्रवास खर्च व दैनंदीन भत्ता तसेच इतर कार्यालयीन खर्च.

क) प्रशिक्षण कार्यक्रमांच्या खर्चाची कमाल मर्यादा प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिन रुपये ५००/- इतकी राहील. यामध्ये तज्ञांचे मानधन, त्यांचा प्रवासखर्च व राहण्याचा खर्च, Learning /Instruction Material चा खर्च, जागेचे भाडे व इतर सुविधावरील खर्च इत्यादीचा अंतर्भाव राहील. तथापि, यामध्ये अधिकारी व कर्मचारी (प्रशिक्षणार्थी) यांच्या प्रवास खर्च व दैनंदीन भत्याचा अंतर्भाव राहणार नाही. प्रवास भत्ता व दैनंदीन भत्ता यांचे दर शासनाच्या प्रचलित नियमानुसार लागू रहातील.

ड) "अधिकारी व कर्मचारी प्रशिक्षण, शैक्षणिक साहित्यांची निर्मिती व गुणवत्ता वाढ कार्यक्रम" या योजनेसाठी मंजूर नियतव्यय "मागणी क्रमांक:डब्ल्यू-३, २२०३ तंत्र शिक्षण, १०३ तंत्र शाळा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना, (०१)(०७) कर्मचारी वर्गाचे प्रशिक्षण, (२२०३ २८६ ७) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत व खर्च करण्यांत यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५६७/का.क्र.१४७१, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१० अन्वये प्राप्त झालेल्या नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र-१००८/प्र.क्र. ७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये सुधारीत करण्यांत आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उप विभाग तीन, अनुक्रमांक ४, नियम क्रमांक २७(२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra. gov. in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०९१५१३१३४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(शोभा वि पत्की)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

१. प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/नाशिक/पुणे/अमरावती/औरंगाबाद/नागपूर (संचालनालयामार्फत)
३. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय ----------- (संचालनालयामार्फत)
४. मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र-------------- (संचालनालयामार्फत)
५. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (व्यशि-२ अर्थसं/साशि-१)
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (का.क्र.१४७१)
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (व्यशि-४)